स्वीयेतर सेवेत प्रतिनियुक्तीवर जाणाऱ्या राज्य संवर्गातील भारतीय पोलीस सेवेतील अधिकाऱ्यांना देय असलेल्या प्रतिनियुक्ती भत्त्यात सुधारणा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आयपीएस-२०१३/प्र.क्र.११२ /पोल-१**

गृह विभाग, ३० वा मजला, सेंटर -१,
जागतिक व्यापार केंद्र,कफ परेड, मुंबई-४०० ००५
तारीख: १३ नोव्हेंबर, २०१४

वाचा

1) **सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक भाप्रसे-३०९४/(३८२)/नऊ, दिनांक ०२ फेब्रुवारी,१९९५.**
2) **वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक स्वीयसे-२०१०/प्र.क्र.६७/सेवा-६, दिनांक ०८ एप्रिल, २०१३.**
3) **शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक भाप्रसे-३०१३/प्र.क्र.३१२/२०१३/नऊ, दिनांक ११ सप्टेंबर, २०१३.**

प्रस्तावना -

स्वीयेतर सेवेत प्रतिनियुक्तीवर जाणा-या भारतीय पोलीस सेवेतील अधिकाऱ्यांना प्रतिनियुक्ती भत्ता मंजूर करण्यासंबधी विशिष्ट तरतुद अखिल भारतीय सेवा अधिनियम १९५१ खालील नियमामध्ये अद्याप करण्यात आलेली नाही. त्यामुळे अखिल भारतीय सेवा (सेवेच्याअटी व शर्ती - उर्वरित बाबी) नियम १९६० च्या नियम २ (ब) नुसार राज्य नागरी सेवेमधील वर्ग-१ च्या अधिकाऱ्यांना लागू असलेल्या प्रतिनियुक्ती भत्यासंदर्भातील आदेश राज्य संवर्गातील भारतीय पोलीस सेवेतील अधिकाऱ्यांना लागू करता येतील.

२. वित्त विभागाच्या क्रमांक स्वियेसे-१०८८/प्र.१०९३/सेवा-२, दिनांक ८.७.१९९० च्या शासन निर्णयान्वये स्वीयेत्तर सेवेत जाणाऱ्या राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना प्रतिनियुक्ती भत्ता मंजूर करण्यात आला असून सदर शासन निर्णयाच्या आधारे सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील दिनांक ०२.०२.१९९५ च्या शासन निर्णयानुसार राज्य संवर्गातील भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्यांना प्रतिनियुक्ती भत्ता मंजूर करण्यात आलेला आहे. सदर शासन निर्णयातील तरतूदीनुसार भारतीय पोलीस सेवेतील अधिकाऱ्यांना देखील प्रतिनियुक्ती भत्ता मंजूर करण्यात येत असे.

३. ६ व्या वेतन आयोगाच्या शिफारशी विचारात घेऊन स्वीयेत्तर सेवेत जाणाऱ्या राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना संदर्भ क्र.२ येथील दिनांक ०८.०४.२०१३ च्या शासन निर्णयान्वये सुधारित दराने प्रतिनियुक्ती भत्ता लागू करण्याचा निर्णय वित्त विभागाने घेतलेला असल्यामुळे राज्य संवर्गातील

भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्यांना सामान्य प्रशासन विभागाने संदर्भ क्र.३ येथील दिनांक ११.०९.२०१३ च्या शासन निर्णयान्वये प्रतिनियुक्ती भत्त्याच्या दरामध्ये सुधारणा केली आहे. राज्य संवर्गातील भारतीय पोलीस सेवेतील अधिकाऱ्यांना प्रतिनियुक्ती भत्ता मंजूर करण्याचे स्वतंत्र असे आदेश नसल्याने, त्यांचे बाबतीत प्रतिनियुक्ती भत्त्यासंदर्भात स्वतंत्र आदेश निर्गमित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय -

स्वीयेतर सेवेत प्रतिनियुक्तीवर जाणाऱ्या राज्य संवर्गातील भारतीय पोलीस सेवेतील अधिकाऱ्यांना खालीलप्रमाणे प्रतिनियुक्ती भत्ता मंजूर करण्यात यावा :-

अ) जेव्हा भारतीय पोलीस सेवेतील अधिकाऱ्याची स्वीयेतर सेवेतील प्रतिनियुक्ती मूळच्याच ठिकाणी (within the same station) असेल तेव्हा दरमहा रु.१,०००/- च्या कमाल मर्यादेच्या अधिनतेने, त्यांच्या मूळ वेतनाच्या ५ टक्के,

ब) इतर प्रकरणी म्हणजे जेव्हा भारतीय पोलीस सेवेतील अधिकाऱ्यांची स्वीयेतर सेवेतील प्रतिनियुक्ती मूळच्या ठिकाणाव्यतिरिक्त इतरत्र ठिकाणी असेल तेव्हा दरमहा रु.२,०००/ च्या कमाल मर्यादेच्या अधिनतेने, त्यांच्या मूळ वेतनाच्या १० टक्के, मात्र त्या त्या वेळचे मूळ वेतन अधिक प्रतिनियुक्ती भत्ता हा कोणत्याही वेळी पे बँड पीबी-४ (रु.६७,०००/-) अधिक प्रतिनियुक्ती पदाच्या ग्रेड वेतनापेक्षा (रु.१००००/- च्या कमाल मर्यादते) जास्त होता कामा नये. जर स्वीयेत्तर सेवेतील पद एचएजी किंवा एचएजी+पे स्केल मधील असेल तर वेळोवेळी करण्यात येणाऱ्या वेतन निश्चिमीमधील मूळ वेतन हे अनुक्रमे रु.७९,०००/- किंवा रु.८०,०००/- पेक्षा अधिक असणार नाही.

टिप-१) हया आदेशाच्या प्रयोजनार्थ "वेतन" म्हणजे भारतीय पोलीस सेवा (वेतन) नियम २००७ मधील नियम २(एए) मध्ये नमूद केल्यानुसार "मूळ वेतन" (पे बँड मधील वेतन अधिक ग्रेड वेतन) होय.

२) वरील (अ) च्या प्रयोजनार्थ "मूळच्याच ठिकणी " याचा अर्थ प्रतिनियुक्तीवर जाण्यापूर्वीचे भारतीय पोलीस सेवेतील अधिकाऱ्यांचे नियुक्तीचे ठिकाण असा असेल.

३) जेथे शेवटी धारण केलेल्या पदाच्या मुख्यालयात बदल होत नसेल तेव्हा अशी बदली त्याच ठिकाणी (within same station) झाली असे समजण्यात यावे आणि जेव्हा मुख्यालय बदलत असेल तेव्हा अशी बदली त्याच ठिकाणी झाली असे मानण्यात येणार नाही. जुन्या मुख्यालयाच्या नागरी समुहामध्ये बदलीचे ठिकाण येत असेल (place falling within the same urban agglomeration of the old headquarters) तेव्हा त्याच ठिकाणी (within the same station) बदली झाली असे समजण्यात यावे.

४) भारतीय पोलीस सेवेतील अधिकारी विविध विभागांतर्गत अशा संवर्गबाहय पदावर कार्यरत असतील, जेथे त्यांच्या वेतन इत्यादीवरील खर्च राज्याच्या एकत्रित निधीमधून होत आहे. अशा प्रकरणी संबंधित भारतीय पोलीस अधिकाऱ्यांना प्रतिनियुक्ती भत्ता अनुज्ञेय असणार नाही. तसेच ज्या महामंडळ/मंडळ/प्राधिकरण/सांविधिक संस्था/ स्वायत्त संस्था यांच्या आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्यासाठी १०० टक्के अनुदान शासनाकडून देण्यात येत असल्यास अशा आस्थापनेवर प्रतिनियुक्तीवर कार्यरत असलेल्या संबंधित भारतीय पोलीस सेवेतील अधिकाऱ्यांना प्रतिनियुक्ती भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

४. हे आदेश सदंर्भ क्र. २ येथील वित्त विभागाच्या दिनांकापासून म्हणजेच दिनांक ०८.०४.२०१३ पासून लागू करण्यात येत आहेत. या दिनांकास व त्यानंतर भारतीय पोलीस सेवेतील जे अधिकारी स्वीयेतर सेवेत प्रतिनियुक्तीवर आहेत, त्यांच्या प्रतिनियुक्ती भत्त्याबाबतची अट यथोचित पूर्वलक्षी प्रभावाने नव्याने घालण्यात यावी. तसेच यापुढे स्वीयेत्तर सेवेत प्रतिनियुक्तीवर जाणा-या भारतीय पोलीस सेवेतील अधिकाऱ्यांच्या अटी/ शर्ती मध्ये प्रतिनियुक्ती भत्त्याबाबतच्या अटीचाही समावेश करण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने आणि त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २७३/सेवा-६, दिनांक ३०.०९.२०१४ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११३१३१४१८७७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kailas Vinayakrao Bilonikar

Digitally signed by Kailas Vinayakrao Bilonikar
DN: CN = Kailas Vinayakrao Bilonikar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Home
Date: 2014.11.13 15:46:24 +05'30'

**( कैलास बिलोणीकर )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) मा. मुख्य सचिव,महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.

४) अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, ३० वा मजला, सेंटर-१, जा.व्या.केंद्र, कफ परेड, मुंबई.

५) प्रधान सचिव (अपील व सुरक्षा) यांचे स्वीय सहायक, ३० वा मजला, सेंटर-१, जा.व्या.केंद्र, कफ परेड, मुंबई.

६) सचिव (विशेष) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, ३० वा मजला, सेंटर-१, जा.व्या.केंद्र, कफ परेड, मुंबई.

७) प्रधान महालेखाकार (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई

८) महालेखापाल - १ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई.

९) महालेखापाल - २ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा) महाराष्ट्र, नागपूर.

१०) महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई

११) महासंचालक, अॅन्टी करप्शन ब्युरो, महाराष्ट्र राज्य, मुंबई

१२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्या., मुंबई

१३) महासमादेशक, गृहरक्षक दल व संचालक, नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

१४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सुरक्षा महामंडळ, मुंबई.

१५) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.

१६) सर्व पोलीस आयुक्त (लोहमार्गसह)

१७) संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक.

१८) आयुक्त, विक्रीकर विभाग, माझगांव, मुंबई.

१९) आयुक्त, अन्न व औषधे प्रशासन, म.रा. बांद्रा-कुर्ला संकूल,बांद्रा (पूर्व), मुंबई.

२०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.

२१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई.

२२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी लिमिटेड, मुंबई.

२३) * सचिव, राज्य मानवी हक्क आयोग, मुंबई. (पत्राद्वारे)

२४) * सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई. (पत्राद्वारे)

२५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य गृहनिर्माण महामंडळ, कलानगर, बांद्रे (पूर्व) मुंबई.

२६) * अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती / जमाती आयोग, वरळी, मुंबई. (पत्राद्वारे)

२७)सर्व अपर पोलीस महासंचालक.

२८) सर्व परिक्षेत्रीय विशेष पोलीस महानिरीक्षक.

२९) नियंत्रक,वैध मापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

३०) मुख्य कार्यकारी अधिकारी, राजीव गांधी जीवनदायी आरोग्य योजना, मुंबई.

३१) सर्व जिल्हा पोलीस अधीक्षक.

३२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

३३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

३४) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

३५) वित्त विभाग (सेवा-६), मंत्रालय, मुंबई.

३६) अवर सचिव, रोख शाखा, गृह विभाग,३० वा मजला, सेंटर-१, जागतिक व्यापार केंद्र, कफ परेड, मुंबई.

३७) सहाय्यक संचालक, भापोसे कक्ष, गृह विभाग, ३० वा मजला, सेंटर-१, जागतिक व्यापार केंद्र, कफ परेड, मुंबई.

३८) निवड नस्ती-पोल-१.

*पत्राद्वारे